लेखाशिर्ष ३०५४-२४१९ अंतर्गत रस्ते व पुल दुरुस्ती परिरक्षण कार्यक्रम योजनेचा निधी जिल्हा परिषदांना वितरणासाठी LRS (Liability Register System) प्रणाली सुरु करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: एलआरएस-२०१९/प्र.क्र.२०१/बांध-३**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक: १५ नोव्हेंबर, २०१९

**संदर्भ:-** (१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. जिपर-२०१२/प्र.क्र.११८/पंरा-८, दिनांक १०.०९.२०१२
(२) शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग, क्र. विकास-२०१७/प्र.क्र.२७२/योजना-६, दिनांक ३१.०३.२०१८

**प्रस्तावना:-**

राज्य शासनामार्फत जिल्हा परिषदांना विविध योजनांसाठी निधी वितरीत केला जातो व त्या अनुषंगाने शासनस्तरावरुन दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार कामांच्या निविदा मागवून कंत्राटदारांना कार्यारंभ आदेश देण्यात येतो. जिल्हा परिषद स्तरावर मंजूर कामांना तांत्रिक मान्यता देणे, निविदांना मिळणारा प्रतिसाद व इतर तांत्रिक बाबींमुळे काम पूर्ण होण्यास अधिक कालावधी लागत असल्याने जिल्हा परिषदेकडे निधी अखर्चित राहतो, परिणामी राज्याच्या एकत्रित निधीतून जिल्हा परिषदांकडे हस्तांतरीत किंवा अभिकरण तत्वावर दिलेल्या योजनांचा निधी हा जिल्हा परिषदेच्या बँक खात्यामध्ये पडून राहतो. कित्येकदा दोन आर्थिक वर्षातही निधी खर्च न झाल्याने पुढील आर्थिक वर्षात अखर्चित निधी खर्च करण्यास परवानगी मिळण्यासाठी शासनाकडे प्रस्ताव प्राप्त होत असतात. असेही निर्देशनास आले आहे की, काही जिल्हा परिषदांमध्ये निधी खर्च न होता अखर्चित राहतो व त्याचवेळी इतर जिल्हा परिषदेकडील त्याच लेखाशिर्षाखालील योजनेची देयके निधी अभावी प्रलंबित असतात. प्रत्येक वेळी पूर्वी वितरीत केलेला निधी खर्च झाल्याची खात्री पटविण्यासाठी उपयोगिता प्रमाणपत्राची मागणी करावी लागते. तसेच एखाद्या प्रकल्पाची सद्यस्थिती काय आहे किंवा एखाद्या टप्प्यावर एखाद्या योजनेचे शासनावर किती दायित्व (Liability) आहे, याची खातरजमा करण्यासाठी वेळोवेळी प्रत्येक जिल्हा परिषदेकडून माहिती संकलित करावी लागते.

या सर्व प्रशासकीय अडचणी, त्रुटी व अकार्यक्षमता दूर करण्यासाठी तसेच केंद्र व राज्य शासनाच्या धोरणानुसार शासकीय कार्यालयातील सर्व आर्थिक व्यवहार रोखविरहीत व धनादेशविरहीत करुन डीजीटल पध्दतीने करण्याच्या अनुषंगाने ग्राम विकास विभागाने LRS (Liability Register System) ही संगणक प्रणाली आयसीआयसीआय (ICICI) बँकेच्या सहयोगाने विकसित करुन राबविण्याबाबत संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये ग्रामविकास विभागातील सर्व योजनांना निधी वितरणासाठी सदर प्रणाली लागू करण्याबाबत निर्देश देण्यात

आले आहेत. या अनुषंगाने "लेखाशिर्ष- ३०५४-२४१९ अंतर्गत रस्ते व पुल दुरुस्ती परिरक्षण कार्यक्रम" ह्या योजनेतील निधी वितरणासाठी LRS ( Liability Register System ) ही संगणक प्रणाली सुरु करण्याबाबत पुढील प्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक:**

रस्ते व पुल दुरुस्ती परिरक्षण कार्यक्रम योजनेअंतर्गत लेखाशिर्ष- ३०५४-२४१९ अंतर्गत २७-लहान बांधकामे या उपलेखाशिर्षाखालील निधी वितरणासाठी LRS ( Liability Register System ) ही संगणक प्रणाली सुरु करण्यात येत आहे.

१. सदर योजनेसाठी ग्राम विकास विभागामार्फत आयसीआयसीआय (ICICI) बँकेमध्ये एक स्वतंत्र खाते उघडण्यात येईल. आवश्यकतेनुसार शासन स्तरावरुन अधिदान व लेखा कार्यालयातून निधी आहरित करुन सदर खात्यामध्ये ठेवण्यात येईल. ही प्रणाली थेट देयक प्रदानाकरिता ICICI बँकेमार्फत राबविण्यात येईल. ICICI बँकेस देयके प्रदानाकरिता आदेश दिल्यानंतर बँकेने T+3 या कालावधीत लाभार्थ्यांच्या/ कंत्राटदाराच्या खात्यात निधीचे थेट प्रदान करणे आवश्यक राहील.

२. सदर LRS ( Liability Register System ) ही संगणकाधारीत वेबबेस्ड प्रणाली राहील. ग्रामीण रस्ते व पुल दुरुस्ती परिरक्षण कार्यक्रम अंतर्गत गट-अ,ब,क व ड मधील कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संदर्भाधीन क्र. (१) येथील दिनांक १०.०९.२०१२ च्या शासन निर्णयाप्रमाणे राहतील. तथापि LRS ( Liability Register System) या प्रणालीमध्ये सर्व गटातील कामांच्या प्रशासकीय मान्यता शासन स्तरावरुन नोंदविण्यात येईल. प्रशासकीय मान्यता प्रदान झाल्यानंतर जिल्हा परिषद स्तरावर निविदा प्रक्रिया पार पाडण्यात येईल. तसेच निवडण्यात आलेल्या निविदाधारकाची माहिती संबंधित कार्यान्वयन अधिकारी LRS संगणक प्रणालीवर भरेल. यामध्ये बँक खाते क्रमांक, IFS CODE इत्यादीचा समावेश राहील. ही माहिती भरल्यानंतर प्रणाली एक संगणक निर्मित संकेतांक (Computer Generated Code) LRS कोड निर्माण करेल. हा संकेतांक नमूद केल्याशिवाय कोणताही कार्यारंभ आदेश देता येणार नाही.

३. यानंतर जिल्हा परिषदेच्या प्रचलित कार्यपध्दतीनुसार कार्यारंभ आदेश देण्यात येतील व कामाच्या प्रगतीनुसार प्रचलित कार्यपध्दतीनुसार बिल/देयक मंजूर करण्यात येईल. ज्यावेळी देयक पारित होईल त्योवळी आहरण व संवितरण अधिकारी उदा. कार्यकारी अभियंता त्या प्रणालीत प्रत्यक्ष प्रदानासाठी मान्य रक्कम वजातीसह नोंदवेल. नियमित कार्यालयीन पध्दतीप्रमाणे प्रत्यक्ष देयक मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांच्याकडे जाईल. मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी देयक पारित केल्यानंतर प्रणालीवरील देयकाची रक्कम व प्रत्यक्ष देयकावरील रक्कम वजातीसह तपासून देयक पारीत करेल व आहरण व संविरण अधिकाऱ्यांने मान्य केलेली रक्कम प्रणालीवर पारीत करेल.

४. सर्व जिल्हा परिषदांना पारीत केलेली रक्कम या प्रणालीद्वारे ग्राम विकास विभाग स्तरावरील नियंत्रक अधिकारी यांना दिसेल. त्यानुसार ICICI बँकेमार्फत, मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी पारित केलेल्या आणि आहरण व संवितरण अधिकाऱ्याने मान्य केलेल्या यादीनुसार, सदर प्रणालीद्वारे पाठविलेल्या यादीप्रमाणे प्रथम नोंदणी करणाऱ्यास प्रथम प्राधान्य

(First Come First Serve) या तत्त्वावर संबंधितांचे खात्यात ही रक्कम जमा केली जाईल. कंत्राटदाराच्या देयकातील वजातीची रक्कम संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या खात्यात जमा केली जाईल. त्यांनी सदर रक्कम आवश्यक शासकीय खात्यात जमा करावी.

५. कंत्राटदारांना काम पूर्ण झाल्यानंतर संबधित कामाचे देयक अदा करण्यात येईल. त्यानंतर सदर सहाय्यक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगीता प्रमाणपत्रे महालेखापाल यांना पाठवून त्याची प्रत या विभागाकडे तात्काळ पाठविण्याची जबाबदारी संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील.

६. सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१११५१२०२२७८९२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Madhukar Kide

Digitally signed by Pravin Madhukar Kide
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=859f23258c70b8895e820d29cbb58add29fb9fa a98eb94efdf34e1ee1a717e23, cn=Pravin Madhukar Kide
Date: 2019.11.16 12:16:02 +05'30'

**( प्र. म. किडे )**
**सचिव**
**मुख्यमंत्री ग्रामसडक योजना**

**प्रत,**

१. मा. मंत्री (ग्रा.वि.) याचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
५. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
९. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०. कार्यकारी अभियंता, बांधकाम उप विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
११. कक्ष अधिकारी, रोखशाखा, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ सं १६/अर्थ सं -१७) मंत्रालय, मुंबई.
१३. का. क्र. वित्त-१, वित्त-७, वित्त-८, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती (बांधकाम-३).